नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांना सन २०१४-१५ च्या खर्चावर आधारित सन २०१५-१६ साठी व २०१५-१६ च्या खर्चावर सन २०१६-१७ या वर्षाचे अनुदान मंजूर करण्याबाबत ....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांक : अनुदान-२०१५/ प्र.क्र. ४०६/१५/राकावि-२

गो.ते.रूग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला,
बी-विंग, मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक : १ डिसेंबर, २०१६.

वाचा -

१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : विअप्र -२०१३/ प्र.क्र.३० /२०१३/विनिमय,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन परिपत्रक क्र.अनुदान-२००९/प्र.क्र.४२ /आरोग्य-५, दिनांक १३ जानेवारी, २०१०.
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. क्र.जा.क्र.ससंआसे/कक्ष-६४/ सहा.अन./नौरोसजी/सुधारीत प्रस्ताव/२०१४-१५/२०१६/१४१२९-३०, दि.०२.११.२०१६.
४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. क्र.जा.क्र.ससंआसे/कक्ष-६४/ सहा.अन./नौरोसजी/सुधारीत प्रस्ताव/२०१४-१५/२०१६/१४१३१-३२, दि.०२.११.२०१६.

प्रस्तावना -

या विभागाच्या वर उल्लेखीत शासन निर्णय दि.१३.०१.२०१० अन्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी, परळ, मुंबई येथील रुग्णालयास शासनाकडून अनुदान मंजूर करण्याबाबत सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले असून त्यानुसार हॅास्पिटलच्या एकूण खर्चातील केवळ वेतन भत्ते व औषधावरील खर्चासाठी संस्थेला अनुदान अनुज्ञेय असून हे अनुदान एकूण खर्चाच्या ८५% मर्यादेत (पैकी ५०% राज्य शासनाचा हिस्सा व उर्वरित ५०% बृहन्मुंबई महानगरपालिकेचा हिस्सा) मंजूर केले जाते. दि. १३.१.२०१० च्या शासन निर्णयानुसार परिगणना केल्याप्रमाणे सन २०१४-२०१५ च्या खर्चावर सन २०१५-१६ साठी पाचव्या वेतन आयोगानुसार वेतन, भत्ते व औषधे, एक्स-रे फिल्मसाठी नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटलच्या एकूण खर्चाच्या ८५% इतक्या कमाल मर्यादेत शासन हिस्याचे ५०% म्हणजेच रुपये १२,०८,१४,६८२/- (अक्षरी रुपये बारा कोटी, आठ लाख, चौदा हजार, सहाशे ब्यांऐंशी फक्त) इतके सहायक अनुदान देय ठरते. त्यापैकी शासन निर्णय बैठक-२०१४/प्र.क्र.३४१/१४/राकावि-

२, दि.२९.०२.२०१६ अन्वये मंजूर करण्यात आलेले आगाऊ अनुदान ६,१५,०१,५००/- वजा जाता रक्कम रु.५,९३,१३,१८२/-इतके अनुदान देय आहे.त्यातून २०१२-१३ व २०१३-१४ साठी सहाव्या वेतन आयोगानुसार होणाऱ्या फरकाचे रुपये ६,५८,३४,०२३/- वजा करावयाची आहे.उर्वरीत रक्कम रुपये ६५,२०,८४१/- सन २०१५-१६ च्या खर्चावर सन २०१६-१७ साठी सहायक अनुदान मंजूरी प्रस्तावातून वजा करण्याचे प्रस्तावित आहे.

सन २०१५-१६ च्या खर्चावर सन २०१६-१७ साठी पाचव्या वेतन आयोगानूसार संस्थेचे वेतन भत्ते व औषधे, एक्स-रे फिल्मसाठी रुग्णालयाच्या एकूण खर्चाच्या ८५% इतक्या कमाल मर्यादेत शासन हिस्याचे ५०% म्हणजेच रुपये १६,०२,४२,४८५/- (अक्षरी रुपये सोळा कोटी, दोन लाख, बेचाळीस हजार, चारशे पंच्याऐंशी फक्त) इतके सहायक अनुदान देय ठरते. त्यामधून सहाव्या वेतन आयोगानुसार होणारी फरकाची रक्कम रुपये ६५,२०,८४१/- वजा करता. नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल परळ, मुंबई यांना सन २०१५-१६ खर्चावर सन २०१६-१७ साठी रुपये १५,३७,२१,६४४/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी, सदोतीस लाख, एकवीस हजार, सहाशे चव्वेचाळीस फक्त) इतके सहायक अनुदान देय आहे. या अनुषंगाने सदर अनुदानाच्या प्रस्तावास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

१) नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस यांना सन २०१४-१५ च्या खर्चावर आधारित सन २०१५-१६ साठी व २०१५-१६ च्या खर्चावर सन २०१६-१७ या वर्षासाठी रुपये १५,३७,२१,६४४/- (रुपये पंधरा कोटी, सदोतीस लाख, एकवीस हजार, सहाशे चव्वेचाळीस फक्त) एवढे अनुदान मंजुर करण्यात येत आहे.

२) तथापि सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात ( २२१० ०१७३) ३१ सहायक अनुदाने (वेत्तनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु.६,००,००,०००/- इतके अनुदान मंजूर असून तरतुदीच्या ८०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्याबाबत वित्त विभागाने दि.२०.०४.२०१६ च्या परीपत्रकाद्वारे कळविले आहे. त्यामुळे नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांना अनुदानाचा पहिला हप्ता म्हणून रु.४,००,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी फक्त) वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच उर्वरित अनुदान उपलब्ध तरतूदीनुसार वितरीत करण्यात येईल.

३) सदर खर्च मागणी क्र. आर-१, २२१० -वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०- ( ०३) मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३)(०१)- अध्यापनेतर रूग्णालये व दवाखाने, यांना सहाय्यक अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने, ( २२१० ०१७३) या तपशिलवार लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ साठी बी.डी.एस. वर उपलब्ध उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४) नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस अनुदान वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आलेले रू. ४,००,००,००० /- ( अक्षरी रुपये चार कोटी फक्त ) अनुदान अदा करण्यासाठी उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५) ज्या-ज्या वेळी निरिक्षणासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना संस्थेचे हिशेब पाहिजे असतील त्या - त्यावेळी ते प्रस्तुत कागदपत्रांसहित संस्थेने सादर करावेत.

६) शासकीय अनुदान म्हणून मिळणाऱ्या रकमेचे हिशेब संस्थेने त्यांच्या नेहमीच्या इतर कार्यक्रमातून वेगळे ठेवणे आवश्यक आहे.

७) मंजूर नसलेल्या बाबींवरील खर्चाचा समावेश अनुदानात करण्यात आल्याचे आढळून आल्यास त्या खर्चाची एक रकमी वसुली करण्याचा अधिकार शासनास राहील. त्याकरिता वेळेचे बंधन असणार नाही.

८) हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमामध्ये करण्यात आलेल्या सुधारणाप्रमाणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ चा भाग पहिला, उपविभाग-एक अनुक्रमांक २७ मधील नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०११८०१०७६६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2016.12.03 15:44:49 +05'30'

**( सं.रा.मोरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक आरोग्य सेवा संचलनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे-१.
३. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
४. सहाय्यक संचालक, ( लेखा व सेवा परिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१/२, मुंबई.
६. जिल्हा कोषाधिकारी, ठाणे/ पुणे.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सहसचिव ( अर्थसंकल्प / राकावि ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१.
९. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई-१.
१०.सचिव, नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई.
११.निवड नस्ती (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-१.